प्रादेशिक मनोरुग्णालय पुणे येथील आहार विभागाचे आधुनिकीकरण करण्यासाठी आलेल्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२४/प्र.क्र. ३०/आरोग्य-३अ,**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: ११ मार्च, २०२५.

<u>वाचा</u> :-

सहसंचालक (आरोग्य संस्थांमार्फ़त राबविण्यात येणारे कार्यक्रम), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र.आआसे/माआ/टे-४/प्रामरुपु/आ.वि./देयक/३६३८-४२/२४, दि. २९.११.२०२४

**<u>प्रस्तावना</u> :-**

शासन निर्णय दि.२१.०२.२०२४ अन्वये प्रादेशिक मनोरुग्णालय पुणे येथील आहार विभागाचे आधुनिकीकरण करण्यासाठी लागणारी उपकरणे, भांडी, यंत्रसामग्री इत्यादी खरेदी GEMS प्रणाली/ई-निविदेद्वारे प्रक्रिया राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. प्रादेशिक मनोरुग्णालय, पुणे येथील आहार विभागाचे आधुनिकीकरण करण्यासाठी केंद्रीय खरेदी समितीमार्फ़त राबविण्यात आलेल्या निविदाप्रक्रियेमध्ये एल-१ ठरलेल्या मे. प्रज्ञा रेफ्रिजरेशन इंजिनियरींग या निविदाकारामार्फ़त प्राप्त दर रु.४,९८,५८,३८०/- (अक्षरी रुपये चार कोटी अठ्ठ्यान्नव लक्ष अठ्ठावन्न हजार तीनशे ऐंशी फ़क्त) (सर्व करांसहीत) प्रमाणे पुरवठा आदेश देण्यास आयुक्तालय स्तरावरील केंद्रीय खरेदी समितीने मान्यता दिलेली आहे. सदर खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

प्रादेशिक मनोरुग्णालय पुणे येथील आहार विभागाचे आधुनिकीकरण करण्यासाठी निविदाप्रक्रियेमध्ये एल-१ ठरलेल्या मे. प्रज्ञा रेफ्रिजरेशन इंजिनियरींग यांनी दि.०६.११.२०२४ रोजी देयक क्र.२४२७ अन्वये सादर केलेल्या रु.४,९८,५८,३८०/- (अक्षरी रुपये चार कोटी अठ्ठ्यान्नव लक्ष अठ्ठावन्न हजार तीनशे ऐंशी फ़क्त) इतक्या रकमेच्या देयकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. निविदेतील नमूद अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच सदर निविदेतील नमूद अट क्र.३ नुसार पुरवठादारास पहिल्या टप्प्यात एकूण रकमेच्या ८० टक्के इतकी रक्कम अदा करण्यात यावी. तर उर्वरित २० टक्के रक्कम काम पूर्ण झाल्यानंतर अदा करण्यात यावी.

३. सदर बाबीवरील खर्च “मागणी क्रमांक-आर-०१, लेखाशिर्ष ४२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा-विषम चिकित्सा, ११०-रुग्णालये व दवाखाने, (०१)(०५)-मध्यवर्ती मनोरुग्णालये (कार्यक्रम), ५२-यंत्रसामग्री व साधनसामग्री (४२१०१११९) या उद्दिष्टाखाली पावसाळी अधिवेशन २०२४ मध्ये पुरवणी मागणीद्वारे प्राप्त झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील अनुक्रमांक ४ नियम क्र ७ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१११५५६१९२८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2025.03.11 16:30:24 +05'30'

(अ. भि. मोरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल १/२, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, आरोग्य भवन, मुंबई
४. उपसंचालक, आरोग्य सेवा, राज्य सार्वजानिक आरोग्य प्रयोगशाळा पुणे
५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव ( अर्थसंकल्प ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती ( आरोग्य-३अ ).